आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सर्वसमावेशक मार्गदर्शक तत्वे / सूचना सुधारीत करणेकरीता शासनास शिफारस करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः स्थाविका-०८१४/प्र.क्र.९७/का.१४८२**

मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२
दिनांक: **०५ सप्टेंबर,२०१४**

<u>वाचा</u>

**शासन निर्णय क्रमांकः स्थाविका-२०११/प्र.क्र.४७/का.१४८२ दि.१३.९.२०११**

**<u>प्रस्तावना</u>**

"लोकोपयोगी लहान कामांचा कार्यक्रम" राज्यात सन १९८४-८५ या वित्तीय वर्षापासून राबविण्यात येत आहे. सन १९९०-९१ मध्ये या कार्यक्रमाचे नामाभिधान "स्थानिक विकास कार्यक्रम" असे करण्यात आले. सन १९९६-९७ पासून या कार्यक्रमाचे नाव "आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम" असे बदलण्यात आले. ज्या कामांना जिल्हा नियोजन समितीत प्राधान्य व महत्व मिळत नाही किंवा जी कामे जिल्हा योजनेत घेण्यात येत नाहीत, अशी लोकोपयोगी कामे या योजनेतून घेतली जातात. हा कार्यक्रम राबविण्याची कार्यपद्धती व या कार्यक्रमांतर्गत कोणकोणती कामे हाती घेता येतील, याबाबतचे मार्गदर्शन शासन स्तरावरुन वेळोवेळी करण्यात येते. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत, संदर्भाधीन शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक: स्थाविका २०११/प्र.क्र.४७/का.१४८२ दिनांक १३/९/२०११ अन्वये सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तथापि, दिनांक १३/९/२०११ नंतर अनुज्ञेय असलेल्या काही कामांच्या अटी व शर्तीमध्ये बदल करण्याकरीता, नवीन कामांचा समावेश करण्यासाठी आणि काही नवीन बाबी अनुज्ञेय करण्यासाठी, शासनाने वेळोवेळी शासन निर्णय निर्गमित केले. यास्तव सदर सूचना अद्ययावत करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. त्याकरीता सविस्तर अभ्यास करण्यासाठी, उपसचिव (का.१४८२) यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत, आतापर्यंतच्या सर्व शासन निर्णयांचा तसेच MPLADS Guidelines चा अभ्यास करून, आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत, नवीन मार्गदर्शक सूचनांचा मसुदा तयार करून तो मा.उपमुख्यमंत्री/विभागाचे प्रभारी मंत्री यांना मान्यतेस्तव सादर करण्याचे काम

करण्याकरीता, शासनाने सर्वकष विचार करून, उपसचिव (का.१४८२) यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १. | उपसचिव (का.१४८२) | .. | अध्यक्ष |
| २. | विशेष कार्यकारी अधिकारी (का.१४८२) | .. | सदस्य |
| ३. | जिल्हा नियोजन अधिकारी, सांगली | .. | सदस्य |
| ४. | जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक | .. | सदस्य |
| ५. | जिल्हा नियोजन अधिकारी, नागपूर | .. | सदस्य |
| ६. | जिल्हा नियोजन अधिकारी, जालना | .. | सदस्य |
| ७. | कार्यासन अधिकारी (का.१४८२) | .. | सदस्य सचिव |

२. वरील प्रयोजनार्थ,गठीत केलेल्या समितीमध्ये आवश्यकतेनुसार निमंत्रित सदस्य यांना देखील बोलाविता येईल.

३. सदर नवीन मार्गदर्शक सूचनांसाठीची कालमर्यादा खालीलप्रमाणे असेल:-

| अ.क्र. | करावयाची कामे | समय मर्यादा | अपेक्षित दिनांक |
|---|---|---|---|
| १ | सदर नवीन मार्गदर्शक सूचनांचा मसुदा तयार करणे व तो अपर मुख्य सचिव (नियोजन) यांना मान्यतेस्तव सादर करणे | ०३ महीने | १५ नोव्हेंबर २०१४ |
| २ | अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्तरावर मसुद्याचे अवलोकन करून तो मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) / मंत्री (नियोजन) यांना सादर करणे | १५ दिवस | ३० नोव्हेंबर २०१४ |
| ३ | मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) / मंत्री (नियोजन) यांच्या मान्यतेनंतर सदर मसुदा मा.आमदार महोदयांच्या सुचनांसाठी शासनाच्या संकेतस्थळावर ठेवणे | २० दिवस | १० डिसेंबर २०१४ ते ३१ डिसेंबर २०१४ |
| ४ | मा. आमदार महोदयांच्या सुचना आवश्यकतेनुसार विचारात घेऊन मार्गदर्शक सूचनांचा मसुदा अंतिम करणे | ०१ महीना | ३१ जानेवारी २०१५ |
| ५ | आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांच्या अंतिम मसुद्यास मा. उपमुख्यमंत्री (नियोजन)/मंत्री (नियोजन) यांची मान्यता घेणे व शासन निर्णय निर्गमित करणे | १५ दिवस | १५ फेब्रुवारी २०१५ |
| ६ | प्रत्यक्षात शासन निर्णय अंमलात आणणे | -- | १ एप्रिल २०१५ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१७१७१४८६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Belgudri
Date: 2014.09.06 14:33:01 +05'30'

**(अरूण शि. बेळगुद्री)**
शासनाचे उपसचिव

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे सचिव,
४) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५) मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
७) मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व)
८) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) विभागीय आयुक्त, (सर्व),
१०) जिल्हाधिकारी, (सर्व),
११) नियोजन विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव
१२) सर्व उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांची कार्यालये,
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१५) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९) सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२१) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) ग्रंथपाल, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१,
२५) भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२०,
२६) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई -४,
२७) महाराष्ट्र कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३,
२८) इंडियन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५,
२९) नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०,
३०) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८,
३१) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, मातोश्री हाईट, पद्माबाई ठक्कर मार्ग, रुपारेल कॉलेज जवळ, माटुंगा (प), मुंबई-२८,
३२) निवड नस्ती/का-१४८२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.